**सैन्यातील धारातीर्थी पडलेल्या महाराष्ट्रातील अधिकारी/जवान यांच्या विधवा/अवलंबितांना तसेच अपंगत्व प्राप्त झालेल्या अधिकारी व जवानांना आर्थिक मदत देण्याबाबत - शहीद जवान संजय भिकमसिंह राजपुत व नितीन शिवाजी राठोड जि. बुलढाणा.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मासैम-२०१९/ प्र. क्र. ६३ /२८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: १६ /०२/२०१९.

**वाचा**

शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.मासैम २०१७/(प्र.क्र.३१०)/२०१७/२८, दिनांक २७/०३/२०१८

**शासन निर्णय**

युध्दात, युध्दजन्य परिस्थितीमध्ये, तसेच देशातील सुरक्षा संबंधी मोहिमेत, चकमकीत / देशाबाहेरील मोहिमेत धारातीर्थी पडलेल्या सैनिकांच्या वारसांना/अपंगत्व आलेल्या सैनिकांना/तसेच देशातील सुरक्षा संबंधी मोहिमेत, चकमकीत धारातीर्थी पडलेल्या सीमा सुरक्षा बल व इतर तत्सम निमलष्कर दलातील अधिकारी /जवानांच्या विधवांना/ कुटुंबियांना संदर्भाधिन दिनांक २७/०३/२०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये आर्थिक मदत देण्यात येते. धारातीर्थी पडलेल्या जवानाच्या बाबतीत देय असलेली आर्थिक मदतीची विभागणी खालीलप्रमाणे विभागून देण्यात येते.१) शहीद सैनिक विवाहीत असेल आणि त्याचे आई-वडीलही हयात असतील तर अ) त्यांची वीरपत्नी- ६० टक्के, ब) वीरमाता- २० टक्के, वीरपिता- २० टक्के क) त्यांचे आई-वडीलांपैकी आई किंवा वडील हयात असल्यास त्यांना ४० टक्के, २) शहीद सैनिक विवाहीत असेल आणि त्याचे आई-वडील हयात नसतील तर त्याची वीरपत्नीला १०० टक्के ३) शहीद सैनिक अविवाहीत असेल आणि त्याचे आई-वडीलही हयात असतील तर त्याचे आई-वडील यांच्यामध्ये समान विभागणी करुन ४) शहीद सैनिक अविवाहीत असेल आणि त्याचे आई-वडील हयात नसतील तर त्यांचे भाऊ/बहीण यांच्यामध्ये समान विभागणी करुन याप्रमाणे विभागणी करण्यात यावी.

दिनांक १४/२/२०१९ रोजी जम्मू काश्मिर मधील पुलवामा येथे सीआरपीएफ ताफ्यावर झालेल्या दहशतवादी हल्ल्यात महाराष्ट्रातील बुलढाणा जिल्हयातील श्री. संजयसिह भिकमसिंह राजपुत व नितीन शिवाजी राठोड, हे जवान शहीद झाले आहेत. या शहीद जवानांच्या कुटुंबियांना प्रत्येकी रुपये ५०.०० लाख इतकी मदत देण्याची घोषणा मा. मुख्यमंत्री महोदयांनी केलेली आहे. त्यानुषंगाने खालील तक्यात नमूद केल्यानुसार, महाराष्ट्र राज्यातील धारातीर्थी पडलेल्या जवानाच्या विधवा / अवलंबितांना आर्थिक मदत देण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे :-

| अ.क्र. | नाव व पत्ता | मृत्यु दिनांक, मोहिम व ठिकाण | वारसाचे नांव व आर्थिक मदतीची रक्कम |
|---|---|---|---|
| १ | नं. ९६१२७०३१७ हेड कॉस्टेंबल **संजय भिकमसिंह राजपुत,** लखानी प्लॉट वार्ड नं. २१, बुलढाणा रोड, मलकापूर, जि. बुलढाणा | १४ फेब्रुवारी २०१९ जम्मू-काश्मिर पुलवामा | १. श्रीम. सुषमा संजय राजपुत ( वीरपत्नी) रु. ३०.०० लाख<br>२. श्रीम. जिजाबाई भिकमसिंह राजपुत (वीरमाता)रु.२०.०० लाख<br>लखानी प्लॉट वार्ड नं. २१, बुलढाणा रोड, मलकापूर, जि. बुलढाणा |
| | | एकूण | **रुपये ५०.०० /- लाख** |
| २ | नं. ०५५२११७८५ कॉंस्टेबल **नितीन शिवाजी राठोड,** मु. चोरपांगरा, पो. बिबी, ता. लोणार, जि. बुलढाणा | १४ फेब्रुवारी २०१९ जम्मू-काश्मिर पुलवामा | १.श्रीम. वंदना नितीन राठोड ( वीरपत्नी) रु. ३०.०० लाख<br>२.श्रीम. सावित्रीबाई शिवाजी राठोड (वीरमाता)रु.१०.०० लाख<br>३.श्री. शिवाजी रामू राठोड (वीरपिता) रु. १०.०० लाख<br>मु. चोरपांगरा, पो. बिबी, ता. लोणार, जि. बुलढाणा |
| | | एकूण | **रुपये ५०.०० लाख** |
| | | एकूण १+२ | **रुपये १००.०० लाख** |

२. धारातीर्थी पडलेल्या जवानांना अनुज्ञेय ठरविलेल्या रक्कमेपैकी २० % म्हणजे प्रत्येकी रु. १०,००,०००/- (रु. दहा लाख फक्त) प्रमाणे शासकीय अनुदानातून तर उर्वरित ८० % रक्कम म्हणजे प्रत्येकी रुपये ४०,००,०००/- ( रु. चाळीस लाख फक्त ) मुख्यमंत्री सहायता (कारगिल) निधीतून घेण्यात आलेल्या व राष्ट्रीयीकृत बँकेत सद्यस्थितीत गुंतविण्यात आलेल्या रु.४३,५०,००,०००/- रकमेच्या व्याजातून अदा करण्यात यावी.

३.	वरील परिच्छेद क्र. २ मध्ये नमूद शासन अनुदानातून द्यावयाच्या रकमेपोटी होणारा खर्च प्रत्येकी रु.१०,००,०००/- (रुपये दहा लाख फक्त) हा मागणी क्र. ए-५ लेखाशीर्ष "२२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, ६० - इतर सामाजिक सुरक्षा व कल्याण कार्यक्रम, १०२ - सामाजिक सुरक्षा योजनेखाली निवृत्तीवेतने, (००)(०४) देशांतर्गत/ सुरक्षासंबंधी मोहिमेत-चकमकीत धारातीर्थी पडलेल्या जवानांच्या विधवांना/अवलंबितांना आर्थिक मदत (२२३५२६०८) ५० - इतर खर्च " या लेखाशीर्षाखाली सन २०१८-२०१९ या वित्तीय वर्षाकरिता मंजूर रु.४७,४०,०००/- (रुपये सत्तेचाळीस लाख चाळीस हजार फक्त) इतक्या अर्थसंकल्पीय तरतूदीतून भागविण्यात यावा.

४.	प्रस्तुत प्रकरणी 'आहरण व संवितरण अधिकारी', म्हणून जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी,बुलढाणा यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. तसेच धारातीर्थी पडलेल्या जवानांच्या विधवांना/अवलंबितांना द्यावयाची आर्थिक मदत ECS द्वारे देण्यात यावी व त्याबाबतचा अहवाल शासनास सादर करण्यात यावा.

५.	हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या सहमतीने निर्गमित केलेल्या शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.मासैम २०१७/(प्र.क्र.३१०) /२०१७/२८, दिनांक २७/०३/२०१८ मधील मार्गदर्शक तत्वांचा अवलंब करुन संजय भिकमसिंह राजपुत व नितीन शिवाजी राठोड या शहीद जवानांच्या विधवा/ अवलंबितांना एक विशेष बाब म्हणून प्रत्येकी रुपये ५०.०० लाख इतके एकरकमी अनुदान मंजूर करण्याबाबतच्या मा. मुख्यमंत्री महोदयांनी केलेल्या घोषणेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६.	सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०२१६१६१८१५६८०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Hemant G Mhapankar
Date: 2019.02.16 16:21:17 +05'30'

**(हे. गो. म्हापणकर)**
**अवर सचिव महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१.	महालेखापाल (लेखा परीक्षा)-१/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,

२.	महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,

३. महालेखापाल (स्थानिक निकाय लेखा परीक्षा व लेखा) महाराष्ट्र, मुंबई-३२
४. कमांडर, महाराष्ट्र-गुजरात एरिया मुख्यालय, कुलाबा, मुंबई ४०० ००५,
५. जिल्हाधिकारी, बुलढाणा,
६. जिल्हा कोषागार अधिकारी, बुलढाणा,
७. संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे ४११ ००६ ( ५ प्रती),
८. जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी, बुलढाणा,
९. सह संचालक, लेखा व कोषागार, संगणक कक्ष, ५ वा मजला, नवीन प्रशासन भवन, मुंबई - ३२,
१०. श्रीम. सुषमा संजय राजपुत ( वीरपत्नी), लखानी प्लॉट वार्ड नं. २१, बुलढाणा रोड, मलकापूर, जि. बुलढाणा
११. श्रीम. जिजाबाई भिकमसिंह राजपुत (वीरमाता), लखानी प्लॉट वार्ड नं. २१, बुलढाणा रोड, मलकापूर, जि. बुलढाणा
१२. श्रीमती वंदना नितीन राठोड,(वीरपत्नी), मु. चोरपांगरा, पो. बिबी, ता. लोणार जि. बुलढाणा
१३. श्रीमती सावित्रीबाई शिवाजी राठोड(वीरमाता), मु. चोरपांगरा, पो. बिबी, ता. लोणार जि. बुलढाणा,
१४. श्री. शिवाजी रामू राठोड,( वीरपिता), मु. चोरपांगरा, पो. बिबी, ता. लोणार जि. बुलढाणा
१५. निवडनस्ती (२ प्रती).